राज्यातील कारखान्यांमध्ये होत असलेल्या आगीच्या दुर्घटना / स्फोट यासारखे अपघात टाळण्यासाठी तसेच त्याबाबत अभ्यास करुन उपाययोजना सूचविणे याकरिता समिती गठीत करण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन

## उद्योग, उर्जा व कामगार विभाग

## शासन निर्णय क्रमांकः एफएसी-२०२१/प्र.क्र. ३५२/कामगार-४

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: १६ डिसेंबर,२०२१.

वाचा -

१) **मा. राष्ट्रीय हरीत लवाद, मुख्य खंडपीठ, नवी दिल्ली यांचे, मुळ अर्ज क्र.१३४/२०२१ मधील दि.२५.०६.२०२१ रोजीचे आदेश.**

प्रस्तावना :-

मे.विशाल फायर वर्क्स,मौ. डेहणे ता.डहाणू जि.पालघर या कारखान्यात दि.१७.०६.२०२१ रोजी लागलेल्या आगीच्या दुर्घटनेत ९ कामगार जखमी झाले होते. सदर दुर्घटनेबाबत द हिंन्दुस्तान टाइम्स या वर्तमानपत्रात प्रसिध्द झालेल्या बातमीपत्राच्या आधारे मा.राष्ट्रीय हरीत लवाद, मुख्य खंडपीठ, नवी दिल्ली, यांचेकडून सु-मोटो मूळ अर्ज क्र. १३४/२०२१ दाखल करण्यात आला होता. सदर प्रकरणी मा.राष्ट्रीय हरीत लवाद, नवी दिल्ली यांनी दि.२५.०६.२०२१ रोजी व्हिडीओ कॉन्फरन्सद्वारे केलेल्या सुनावणीमध्ये आदेश पारीत केले आहेत. सदर आदेशानुसार मा. राष्ट्रीय हरीत लवाद, मुख्य खंडपीठ, नवी दिल्ली यांनी राज्यात अशा प्रकारचे अपघात टाळण्याकरीता सर्वोच्च स्तरावर उपाययोजना करण्यासाठी संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई यांनी महाराष्ट्र प्रदूषण मंडळ आणि केंद्रीय प्रदूषण नियंत्रण मंडळ यांच्या समन्वयांनी आढावा घेण्याचे निर्देश दिले आहेत. त्यानुसार, राज्यातील अतिधोकादायक, धोकादायक आणि रासायनिक उत्पादन प्रक्रिया करणाऱ्या कारखान्यांमधील संभाव्य अपघात, व्यावसायिक आणि पर्यावरणीय धोके टाळण्यासाठी अभ्यास करणे व त्यावर उपाययोजना सुचविणे यासाठी समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. यासंदर्भात पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

राज्यातील अतिधोकादायक, धोकादायक आणि रासायनिक उत्पादन प्रक्रिया करणाऱ्या कारखान्यांमध्ये होत असलेल्या आगीच्या दुर्घटना / स्फोट यासारखे अपघात टाळण्यासाठी तसेच त्याबाबत अभ्यास करुन उपाययोजना सूचविणे तसेच धोकादायक प्रक्रियेत वापरल्या जाणाऱ्या सामुग्रीचे प्रमाण,धोकादायक प्रक्रियेत काम करणाऱ्या कामगारांची संख्या,सुरक्षा उपाययोजना व त्यानुषंगाने पुर्तता करणे आणि राज्यातील अशा प्रक्रियेमुळे संभाव्य अपघात,व्यावसायीक आणि पर्यावरणीय धोके यांचा अभ्यास करण्याची गरज मा. राष्ट्रीय हरीत लवाद, मुख्य खंडपीठ, नवी दिल्ली यांनी अधोरेखित केली आहे. त्यानुसार राज्यातील अतिधोकादायक, धोकादायक आणि रासायनिक उत्पादन प्रक्रिया करणाऱ्या कारखान्यांमधील आगीच्या दुर्घटना / स्फोट यासारखे अपघात टाळण्यासाठी तसेच त्याबाबत अभ्यास करुन उपाययोजना सूचविण्यासाठी संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई यांच्या अध्यक्षतेखाली पुढीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदाधिकारी | समितीवरील सदस्यांचे पदनाम |
|---|---|---|
| १. | संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई. | **अध्यक्ष** |
| २. | सह संचालक,महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ,मुंबई. | **सदस्य** |
| ३. | सह संचालक, केंद्रीय प्रदूषण नियंत्रण मंडळ, मुंबई. | **सदस्य** |
| ४. | मुख्य अग्निशमन अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, अंधेरी, मुंबई. | **सदस्य** |
| ५. | सह मुख्य नियंत्रक, स्फोटके (Joint Chief Controller of Explosives), सीबीडी बेलापूर, नवी मुंबई. | **सदस्य** |
| ६. | अतिरिक्त / सह संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई. | **सदस्य सचिव** |

०२. **सदर समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील :-**

१) राज्यातील अतिधोकादायक, धोकादायक आणि रासायनिक उत्पादन प्रक्रिया करणाऱ्या कारखान्यांमधील आगीच्या दुर्घटना / स्फोट असे अपघात टाळण्यासाठी संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय,मुंबई यांनी महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ आणि केंद्रीय प्रदूषण नियंत्रण मंडळ यांच्या समन्वयाने आढावा घ्यावा .

२) समितीने करावयाच्या अभ्यासामध्ये प्रामुख्याने परवानगी दिलेल्या कारखान्यांची संख्या, कारखान्यांचा आकार,कारखान्यात वापरल्या जाणा-या सामुग्रीचे प्रमाण, कारखान्यांचे निकष, कारखान्यातील अग्निशमन व्यवस्था, कामगारांचे आरोग्य आणि सुरक्षा याबाबींचा समावेश असावा.

३) सदर अभ्यास पुर्ण करण्याकरीता समिती त्यांना आवश्यक असेल अशा तज्ञ व्यक्तींची मदत घेऊ शकते.

४) संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई यांच्या अध्यक्षतेखालील समितीने वरील बाबींचा सखोल अभ्यास करुन यासंदर्भातील अहवाल आपल्या शिफारशींसह ३ महिन्यात शासनास सादर करावा.

०३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२१६१५४३१७९५१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DR. SHRIKANT LAXAMANRAO PULKUNDWAR

Digitally signed by DR. SHRIKANT LAXAMANRAO PULKUNDWAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=INDUSTRIES, ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=feb24b5f5d1512bb47f7bae5ad1db4953358cd43c999bdf0814c6bb78364d50a, cn=DR. SHRIKANT LAXAMANRAO PULKUNDWAR
Date: 2021.12.16 17:45:36 +05'30'

**( डॉ. श्री. ल. पुलकुंडवार )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्र्यांचे सचिवालय, मंत्रालय, मुंबई.
३) मा. उप मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, उप मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
४) मा.सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

५) मा.मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) मा.अपर मुख्य सचिव (उद्योग), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) मा. प्रधान सचिव (कामगार), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) मा. प्रधान सचिव (पर्यावरण), पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) आयुक्त (कामगार), कामगार आयुक्तालय,कामगार भवन, बांद्रा(पू.) मुंबई-५१.
१०) संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई.
११) सह संचालक, केंद्रीय प्रदूषण नियंत्रण मंडळ, मुंबई.
१२) सह संचालक,महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ, मुंबई.
१३) सह मुख्य नियंत्रक, स्फोटके (Joint Chief Controller of Explosives), सीबीडी बेलापूर, नवी मुंबई.
१४) मुख्य अग्निशमन अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, अंधेरी, मुंबई.
१५) उप सचिव (कामगार-४), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) अतिरिक्त / सह संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई.
१७) निवडनस्ती (कामगार-४), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.